**सातारा सैनिकी शाळेला सन २०१४-१५ व २०१५-१६ या आर्थिक वर्षाच्या अंदाजपत्रकीय तूटीच्या पूर्ततेसाठी अनुदान मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सासैस्कू २०१६/ प्र.क्र. ९९/ एसएम-६**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय , मुंबई ३२
तारीख: १५ डिसेंबर, २०१६

<u>वाचा</u>

१) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं २०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २० एप्रिल,२०१६
२) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) शिक्षण संचालनालय,यांचे क्र.सैशा/२०१६-१७/कोवि/सैस्कूअंतू/२०१६/४४६२ दिनांक २६ जुलै,२०१६ चे पत्र
३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. सासैशा २०१६/(२४/१६)/एसएम ६, दिनांक २० सप्टेंबर,२०१६
४) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. पुर्नवि २८१६/(७०/१६)/अर्थसंकल्प, दिनांक ५ डिसेंबर,२०१६
५) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,क्र. अनुवि ४९१६/(३२/१६) अर्थसंकल्प, दिनांक ६ डिसेंबर,२०१६

<u>प्रस्तावना</u>-

सन १९६१ साली सातारा सैनिकी शाळेची स्थापना भारत सरकारने केलेली आहे. या सैनिकी शाळेची निर्मिती करताना नियमावली करण्यात आली होती. या नियमावलीमध्ये शाळेमध्ये द्यावयाची प्रवेश पध्दती, शाळेचे प्रशासन व राज्य सरकारचे दायित्व इ. बाबी अंतर्भूत केलेल्या आहेत. या नियमाच्या अनुषंगाने शाळेचे एकूण कामकाज लोकल बोर्ड ऑफ ॲडमिनिस्ट्रेशन या समितीने मान्य केलेल्या प्रस्तावानुसार चालते. लोकल बोर्ड ऑफ ॲडमिनिस्ट्रेशनने ज्या खर्चास मान्यता दिली असेल त्या खर्चाची प्रतिपूर्ती करताना जी तूट येईल ती तूट राज्य शासनाने भरून द्यावी, अशी तरतूद सैनिक स्कुल सोसायटी नियमावलीत केलेली आहे. आर्थिक तरतूदीपेक्षा अधिक होणारा खर्च तूटीच्या अंदाजपत्रक म्हणून सादर केल्यानंतर त्यास राज्य शासना कडून मान्यता देण्यात येते. सातारा सैनिक शाळेला सन २०१४-१५ व सन १५-१६ या वर्षाच्या अंदाजपत्रकातील तूटींची पूर्तता करण्यासाठी अनुक्रमे रु.२,२२,१०,६५९/- व रु.२,५४,२६,३२२/- इतका निधी मंजूर करण्याबाबत सातारा सैनिक शाळेने विनंती केली आहे. सन २०१४-१५ या वर्षाच्या अंदाजपत्रकीय तूटीच्या रकमेपैकी ५० टक्के निधी मंजूर झालेला आहे. सबब सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाच्या अंदाजपत्रकीय तूटीतील उर्वरित ५० टक्के निधी व सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाकरीता आलेली अंदाजपत्रकीय तूट भरून काढण्यासाठी सातारा सैनिक शाळेला निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>-**

२. "मागणी क्रमांक ई-२, २२०२-सर्वसाधारण शिक्षण,०२ माध्यमिक शिक्षण-११०, अशासकीय माध्यमिक शाळांना सहाय्य (००) (००) (०३) पूर्वाध्ययन सैनिकी शाळांना सहायक अनुदान (२२०२ ०४६९) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी उपलब्ध झालेल्या तरतूदीमधून सातारा सैनिक शाळेला अंदाजपत्रकीय तूट भरुन काढण्यासाठी सन २०१४-१५ या वर्षाकरीता रू. रु.१,११,००,०००/- (रुपये एक कोटी अकरा लाख फक्त ) व सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाकरीता रू. २,५४,००,०००/-(रुपये दोन कोटी चौपन्न लाख फक्त ) असा एकूण रु. ३,६५,००,०००/-(रुपये तीन कोटी पासष्ट लाख फक्त ) इतका निधी वितरीत करण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे .

३. सदर निधी वितरीत करण्यासाठी आयुक्त ( शिक्षण ), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच सहायक संचालक ( लेखा ) माध्यमिक व उच्च माध्यमिक, शिक्षण संचालनालय,पुणे यांना या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणा-या निधीकरीता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर रक्कम प्रत्यक्षात वितरीत करण्यापूर्वी सातारा सैनिक शाळा यांचेकडील अभिलेखे लेखाशाखेमार्फत तपासून वित्तिय तूटीबाबत खातरजमा करण्यात यावी व तद्नंतर सदर रक्कम वितरीत करुन प्रतिपूर्ती अहवाल एक महिन्याच्या आत शासनास सादर करावा.

४. तसेच वित्त्त विभागाच्या दिनांक २०/४/२०१६ च्या परिपत्रकानुसार खालील बाबी नमूद करण्यात येत आहेत.

१) यापूर्वी वितरीत केलेल्या अनुदानापैकी ७५ टक्के पेक्षा अधिक खर्च झाला आहे.
२) ज्या लेखाशीर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षाअंतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.
३) साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS व्दारे आंहरित करावी.
४) दिनांक २०/४/२०१६ च्या आदेशातील इतर मुद्दे या आदेशास लागू नाहीत.

५. सदर शासन निर्णय या विभागाच्या संदर्भाधीन दिनांक ५/१२/२०१६ व दिनांक ६/१२/२०१६ च्या शासन निर्णयान्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६१२१५१६५२२०७६२१ असा आहे. हा आदेश डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने

Sangita Dinesh Shelke

Digitally signed by Sangita Dinesh Shelke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9ace0ca0b129ab4da8f9e911057d75e7fbf6f6bd0b55e8ff7ca0deacfa15e1c0, cn=Sangita Dinesh Shelke
Date: 2016.12.15 16:58:02 +05'30'

**( संगिता शेळके )**
कार्यासन अधिकारी महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. मंत्री (शालेय शिक्षण ) यांचे खाजगी सचिव
२) प्रधान सचिव, (शालेय शिक्षण )मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
३) आयुक्त ( शिक्षण ), महाराष्ट्र राज्य, पुणे
४) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे
५) उप सचिव (एसएम),शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
६) सहायक संचालक ( लेखा ), माध्यमिक व उच्च माध्यमिक, शिक्षण संचालनालय, पुणे
७) शिक्षणाधिकारी ( माध्यमिक ) जिल्हा परिषद, सातारा.
८) प्रधान महालेखापाल ( लेखा परीक्षा ), महाराष्ट्र-१, मुंबई
९) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र-१, मुंबई
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा.
११) वरीष्ठ कोषागार अधिकारी, पुणे.
१२) प्राचार्य, सैनिकी स्कूल, सातारा
१३) सचिव, संरक्षण मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.
१४) मानद सचिव, बोर्ड ऑफ गव्हर्नर सैनिकी स्कूल, नवी दिल्ली.
१५) कार्यासन अधिकारी ( अर्थसंकल्प ) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) वित्त विभाग,व्यय-५/अर्थसंकल्प-३ मंत्रालय,मुंबई-३२
१७) निवड नस्ती (एसएम-६)